**भाषा संचालनालयातील पर्यवेक्षक (मराठी), गट-ब (अराजपत्रित) व अनुवादक (मराठी), गट-क या पदांचे सेवाप्रवेश नियमात सुधारणा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
मराठी भाषा विभाग,
शासन निर्णय क्रमांक : भासंसे-२०१४/प्र.क्र.१६१/२०१४/आस्था-२,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०१७.

**शासन निर्णय :**

भाषा संचालनालयातील पर्यवेक्षक (मराठी), गट-ब (अराजपत्रित) या पदाचे दि.२६ मार्च, १९८० व अनुवादक (मराठी), गट-क या पदाच्या दि.१ नोव्हेंबर, १९८३ रोजी संविधानाच्या अनुच्छेद-३०९ अंतर्गत प्रसिध्द केलेल्या सेवाप्रवेश नियमामध्ये करावयाची सुधारणा सोबतच्या अधिसूचनेत (इंग्रजी व मराठी) दर्शविल्याप्रमाणे शासन विहित करीत आहे.

२. उपरोक्त अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या असाधारण राजपत्रात स्वतंत्ररित्या प्रसिध्द करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्रमांक **२०१७०३३०१२१५३७०४३३** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Aparna Arvind Gawde
Digitally signed by Aparna Arvind Gawde
Date: 2017.04.03 13:00:48 +05'30'

**(अपर्णा अ.गावडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव, मुंबई.
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुंबई.
मा.राज्यपाल यांचे परिवार प्रबंधक, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
सर्व अतिरिक्त मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई, (पत्राने).
सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग (सेवा), मंत्रालय, मुंबई.
सह सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई (पत्राने).
भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
निवड नस्ती.

## अधिसूचना

मराठी भाषा विभाग,
मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०१७

**भारताचे संविधान**

क्रमांक :- **भासंसे-२०१४/प्र.क्र.१६१/२०१४/आस्था-२** .- भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद ३०९ च्या परंतुकाद्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन आणि त्याबाबतीत करण्यात आलेल्या सर्व विद्यमान नियम, आदेश किंवा अनुदेश यांचे अधिक्रमण करुन, महाराष्ट्राचे राज्यपाल, याद्वारे, महाराष्ट्र शासनाच्या, मराठी भाषा विभागाच्या अधिपत्याखालील भाषा संचालनालयामधील पर्यवेक्षक (मराठी), गट-ब (अराजपत्रित) व अनुवादक (मराठी), गट-क (अराजपत्रित) पदांच्या सेवाप्रवेशाचे विनियमन करणारे पुढील नियम करीत आहेत, ते असे :-

(१) या नियमांस, मराठी भाषा विभागाच्या अधिपत्याखालील भाषा संचालनालयातील पर्यवेक्षक (मराठी), गट-ब (अराजपत्रित) व अनुवादक (मराठी), गट-क (सेवाप्रवेश) नियम, २०१७ असे म्हणावे.

(२) या नियमांमध्ये संदर्भानुसार दुसरा अर्थ अपेक्षित नसेल तर,-

(क) "**आयोग**" याचा अर्थ, महाराष्ट्र लोकसेवा आयोग असा आहे;

(ख) "**पदवी**" याचा अर्थ, सांविधिक विद्यापीठाची पदवी असा आहे;

(ग) "**विभाग**" याचा अर्थ, शासनाचा मराठी भाषा विभाग असा आहे;

(घ) "**संचालनालय**" याचा अर्थ, शासनाच्या मराठी भाषा विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील भाषा संचालनालय असा आहे;

(ङ) "**शासन**" याचा अर्थ, महाराष्ट्र शासन असा आहे.

(३) संचालनालयामधील **पर्यवेक्षक (मराठी)**, **गट-ब (अराजपत्रित)** पदावरील नियुक्ती, भाषा संचालनालयामधील अनुवादक (मराठी) हे पद धारण करणाऱ्या व या पदावर किमान पाच वर्षांपेक्षा कमी नाही इतकी नियमित सेवा झालेल्या आणि सदर पदावर पदोन्नतीसाठी पात्र ठरविण्यासाठी विहित करण्यात आलेली विभागीय परीक्षा उत्तीर्ण केलेल्या, योग्य व्यक्तीची ज्येष्ठता अधिन पात्रता या निकषावर पदोन्नतीने करण्यात येईल.

(४) संचालनालयामधील **अनुवादक (मराठी)**, **गट-क** पदावरील नियुक्ती, पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने करण्यात येईल-

(एक) ज्याचे, वय अडतीस वर्षांपेक्षा अधिक नाही:

परंतु, आधीपासून शासकीय सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांच्या बाबतीत कमाल वयोमर्यादा पाच वर्षांपर्यंत शिथिल करण्यात येईल. शासन

सेवेतील मागासवर्गीय कर्मचाऱ्यांना ५ वर्षे शिथिलतेची सवलत ते शासन कर्मचारी किंवा मागासवर्ग म्हणून त्यापैकी केवळ एकाच कारणाकरिता उपलब्ध राहील;

(दोन) ज्यांनी, मराठी विषयासह पदवी धारण केली आहे;

(तीन) जे सांविधिक विद्यापीठाच्या तीन वर्षाच्या पदवी अभ्यासक्रमामध्ये किमान एक वर्ष इंग्रजी किंवा व्यावहारिक इंग्रजी विषयासह उत्तीर्ण झाले आहेत:

परंतु, ज्यांनी, उपखंड (दोन) व (तीन) मध्ये नमूद केलेल्या अर्हतेसह विधी विषयातील पदवी धारण केली आहे त्यांना प्राधान्य देण्यात येईल.

(५) नियम ३ व ४ मध्ये नमूद केलेल्या पदांवर नियुक्त केलेल्या व्यक्तीस, शासन वेळोवेळी विहित करेल असे प्रशिक्षण यशस्वीरित्या पूर्ण करणे आवश्यक राहील.

(६) नियम ४ मध्ये नमूद केलेल्या पदावर नियुक्त केलेल्या व्यक्तीस, सेवा प्रवेशोत्तर परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

(७) नियम ३ व ४ मध्ये नमूद केलेल्या पदांवर नियुक्त केलेल्या व्यक्तीस, त्याबाबतीत केलेल्या नियमानुसार मराठी व हिंदी भाषा परीक्षा अगोदरच उत्तीर्ण केलेली नसेल किंवा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळालेली नसेल तर, त्याला सदर परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

(८) नियम ३ व ४ मध्ये नमूद केलेल्या पदांवर नियुक्त केलेल्या व्यक्तीने, महाराष्ट्र शासनाच्या माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाकडून वेळोवेळी विहित केलेले "संगणक हाताळणीबाबतचे प्रमाणपत्र" धारण करणे आवश्यक राहील.

(९) नियम ४ मध्ये नमूद पदावर नियुक्त करण्यात आलेली व्यक्ती महाराष्ट्र राज्यात कोठेही बदली करण्यास पात्र राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Aparna Arvind Gawde

Digitally signed by Aparna Arvind Gawde
Date: 2017.04.03 12:58:47 +05'30'

**(अपर्णा अ.गावडे)**
**शासनाचे उप सचिव**

# -NOTIFICATION-

Marathi Language Department,
Madam Cama Road,
Hutatma Rajguru Chowk,
Mantralaya, Mumbai 400 032.
Dated the 30 March, 2017

Constitution of India.

No.DLR-2014/C.R.161/2014/Astha-2 .- In exercise of the powers conferred by the proviso to article 309 of the Constitution of India and in supersession of all existing rules, orders or instruments made in this behalf, the Governor of Maharashtra is hereby pleased to make the following rules regulating recruitment to the posts of Supervisor (Marathi), Group B (Non-Gazetted) and Translator (Marathi), Group C (Non-Gazetted) in the Directorate of Languages under the Marathi Language Department of the Government of Maharashtra, namely :-

1. These rules may be called the Supervisor (Marathi), Group B (Non-Gazetted) and Translator (Marathi), Group C, in the Directorate of Languages under the Marathi Language Department (Recruitment) Rules, 2017.

2. In these rules, unless the context otherwise requires,-

(a) "Commission" means the Maharashtra Public Service Commission;

(b) "Degree" means a degree of a statutory University;

(c) "Department" means the Marathi Language Department of Government;

(d) "Directorate" means the Directorate of Languages under the administrative control of Marathi Language Department of the Government;

(e) "Government" means the Government of Maharashtra.

3. Appointment to the post of Supervisor (Marathi), Group B (Non-Gazetted) in the Directorate shall be made by promotion of a suitable person on the basis of seniority subject to fitness from amongst the

persons holding the post of Translator (Marathi) in the Directorate, having not less than five years regular service in that post and has passed the Departmental Examination prescribed by the Government for being eligible to be promoted for the post of Supervisor (Marathi) in the Directorate.

4. Appointment to the post of Translator (Marathi), Group C in the Directorate shall be made by nomination from amongst the candidates who, -

*(i)* are not more than thirty-eight years of age:

Provided that, the upper age limit may be relaxed upto five years in case of candidates already in the Government Service. In case of person of backward category who is already in Government service can get relaxation upto five years either as Government servant or backward category candidate;

*(ii)* possess degree along with Marathi subject;

*(iii)* have passed with English or Communication Skills in English as one of the subject atleast in one year of three years degree course of a statutory University:

Provided that, preference shall be given to the candidates who possess degree in Law along with the qualifications mentioned in sub-clauses *(ii)* and *(iii)*.

5. A person appointed to the posts mentioned in rules 3 and 4 shall be required to complete the training successfully as may be prescribed by the Government, from time to time.

6. A person appointed to the post mentioned in rule 4 shall be required to pass post-recruitment examination.

7. A person appointed to the posts mentioned in rules 3 and 4 shall be required to pass examination in Marathi and Hindi languages according to the rules made in that behalf, unless he has already

passed or has been exempted from passing those examinations.

8. A person appointed to the posts mentioned in rules 3 and 4 should possess a Certificate in Computer Operation as prescribed by the Directorate of Information Technology, Government of Maharashtra, from time to time.

9. A person appointed to the post mentioned in rule 4 shall be liable for transfer anywhere in the State of Maharashtra.

By order and in the name of the
Governor of Maharashtra,

Aparna
Arvind
Gawde

Digitally signed by
Aparna Arvind Gawde
Date: 2017.04.03
12:57:09 +05'30'

(Aparna A. Gawde)
Deputy Secretary to Government.